राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत "संरक्षित शेती प्रकल्प" हा सन २०१७-१८ मध्ये राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राकृवियो-२०१७/प्र.क्र.१५३/९-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०७ ऑगस्ट, २०१७

वाचा:- कृषी ,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन पत्र क्र. RKV-0317/C.R.14/RKVY CELL, Dated 9th June, 2017.

**प्रस्तावना :-**

मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली दि.२५ मे, २०१७ रोजी झालेल्या राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) २३ व्या बैठकीत राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत "संरक्षित शेती" हा रु.५०.०० कोटी रकमेचा प्रकल्प राज्यात राबविण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

संरक्षित शेतीस राज्यातील शेतक-यांचा वाढता प्रतिसाद लक्षात घेता, राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत, "संरक्षित शेती" हा रु.५०.०० कोटी रकमेचा प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तद्नुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत "संरक्षित शेती" हा रु. ५०.०० कोटी रकमेचा प्रकल्प **सन २०१७-१८ मध्ये** राज्यात राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.
२. सदर प्रकल्प एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यात राबविण्यात येईल.
३. प्रकल्पातंर्गत निधीचे वाटप जिल्हा/ तालुका निहाय करण्यात यावे.
४. प्रकल्पातंर्गत लाभार्थ्यांची निवड लॉटरी (Lottery) पध्दतीने, हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून साधारणत: १ महिन्याचे कालावधीत करण्यात यावी.
५. लॉटरीची प्रक्रिया, जाहिरातीत नमूद केलेल्या तारखेस करण्याचा सर्वोतोपरी प्रयत्न करण्यात यावा.
६. लॉटरीव्दारे लाभार्थ्याची निवड झाल्यानंतर, पूर्वसंमती देण्याची प्रक्रिया साधारणपणे दोन आठवडयात पूर्ण करण्यात यावी.
७. निवडलेल्या लाभार्थ्याच्या प्रकल्पांची नियमानुसार रीतसर तपासणी पुढील २-३ आठवडयांनी करण्यात यावी.
८. लाभार्थ्याची अनुदान मागणी प्राप्त झाल्यावर साधारणपणे १५ कार्यालयीन दिवसाच्या कालावधीत DBT व्दारे अनुदान वितरण करण्याचा प्रयत्न करावा.
९. प्रकल्पाचा निधी पूर्वसंमती शिवाय उभारण्यात आलेल्या प्रकल्पाकरीता वापरण्यात येवू नये.

१०.प्रस्तुत प्रकल्प राबविण्याकरीता निधी वितरणाची कार्यवाही राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई यांच्याकडून करण्यात येईल.

११.प्रकल्पाची अंमलबजावणी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन व औषधी वनस्पती मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे संनियंत्रणाखाली कृषि विभागामार्फत करण्यात यावी.

१२.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांनी, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल, याची दक्षता घ्यावी.

१३. सदर प्रकल्प राबविण्याबाबतच्या सविस्तर मार्गदर्शक सूचना संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन व औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांचेमार्फत निर्गमीत करण्यात येतील.

१४.राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत, “संरक्षित शेती” प्रकल्पासाठी उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी आर्थिक वर्षात अखर्चित राहणार नाही याची काळजी अंमलबजावणी यंत्रणांनी घ्यावी.

१५.योजनेतील निधी खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांनी राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यास वेळोवेळी सादर करण्याची कार्यवाही करावी.

१६.सदर शासन निर्णयाची काटेकोरपणे अमंलबजावणी होईल याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. या योजनेसाठी खर्च करताना सर्व वित्तीय नियम, विनियम, वित्तीय शासन निर्णय, अधिसूचना, आदेश, केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश, केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना आणि भारताचे नियत्रंक व महालेखापरिक्षक यांचे या संदर्भातील निरिक्षण आणि खर्चात अनियमतता होणार नाही यांचे पालन होईल या अटीच्या अधिन राहून निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१७.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८१०१२५७५८५९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=AGRICULTURE AND ADF DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c08eef62183520696d2005b153b8cc2a552337a23fc4d457a4434216d9324c3b, serialNumber=6fd0ddfb9412fda09432e5f8a3e140c065770ba4ca63ef6fc5ba354810e2828b, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2017.08.10 12:48:30 +05'30'

(क.य.वंजारे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन,

**प्रति,**

१) मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२) मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२

३) मा.विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा.प्रधान सचिव, (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई -३२
५) आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
७) सर्व संचालक कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
८) सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
९) सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
१०) सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई /नागपूर,
१२) संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई ( २ प्रती)
१३) सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२,
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१६) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१७) लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
१८) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१९) रा.कृ.वि.यो.कार्यासन, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०) निवड नस्ती.